अहिल्यानगर जि. अहिल्यानगर येथे मुलींसाठी नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था स्थापन करण्याकरीता अभ्यासक्रम व त्यासाठी आवश्यक खर्चास मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक आयटीआय-२०२५/प्र.क्र.८९/व्यशि-३,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : १६ मे, २०२५**

**वाचा** : १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२००९/(७/०९)/व्यशि-३ दि. २६.६.२००९

२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे क्र.०७ /सीटीएस /अहिल्यानगर नवीन औप्रस (मु.)/२०२५/२२१ दिनांक: २९.०४.२०२५ चे पत्र

**प्रस्तावना**

महिलांना रोजगार व स्वयंरोजगार करण्यासाठी प्रवृत्त करणे आणि त्याव्दारे त्यांची अर्थिक परिस्थिती बळकट करणेकरीता व्यवसाय शिक्षणाची संधी उपलब्ध करणे आवश्यक आहे. याकरीता विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधून महिलांसाठी काही व्यवसाय सुरु करण्यात आले असून सर्वसाधारण औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधून ३० टक्के जागा देखील त्यांच्याकरीता राखीव ठेवण्यात आल्या आहेत.

२. सद्य:स्थितीत १५ जिल्हयांच्या ठिकाणी महिलांसाठी १५ औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू आहेत. या संस्थामध्ये प्रवेशाचे प्रमाण चांगले आहे. तथापि, अन्य सर्वसाधारण संस्थांमधील महिलांसाठी राखीव असलेल्या जागांवर प्रवेशाचे प्रमाण तुलनेने कमी असल्याचे दिसून येत आहे. यामुळे महिलांसाठी स्वतंत्र औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरू केल्यास महिला कौशल्य प्रशिक्षणासाठी प्रोत्साहित होतील.

३. ही बाब लक्षात घेऊन जिल्ह्याच्या ठिकाणच्या महिलांना प्रशिक्षणाच्या संधी उपलब्ध होण्यासाठी २० जिल्हांच्या ठिकाणी महिलांसाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची स्थापना करण्यासाठी उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.२६/०६/२००९ रोजीच्या शासन निर्णयानूसार तत्वतः मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात २० जिल्ह्यामध्ये अहिल्यानगर (तत्कालीन अहमदनगर जिल्हा) या जिल्हयाचे नावाचा समावेश आहे.

४. त्याअनुषंगाने अहिल्यानगर जि. अहिल्यानगर येथे मुलींसाठी नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :

शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था अहिल्यानगर जि. अहिल्यानगर येथे मुलींसाठी नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. संस्थेत सुरु करावयाच्या अभ्यासक्रमाचा तपशिल “प्रपत्र अ” मध्ये देण्यात आला आहे.

२. औद्योगिक प्रशिक्षण संस्था अहिल्यानगर जि. अहिल्यानगर येथे मुलींसाठी नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु कण्याकरीता एकूण २७ शिक्षक व शिक्षकेत्तर आणि बाह्ययंत्रणेव्दारे भरावयाची १२ पदे अशाप्रकारे एकूण ३९ पदांना व त्यांच्या वेतनाकरीता प्रतिवर्षी रु. २३२.०१ लाख खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३. औद्योगिक प्रशिक्षण संस्था अहिल्यानगर जि. अहिल्यानगर येथे मुलींसाठी नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था करीता यंत्रसामुग्री, हत्यारे याकरीता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात आवर्ती व अनावर्ती अशा एकूण रू. ११८०.१९ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी ऐंशी लाख एकोणवीस हजार फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्चाचा तपशिल “प्रपत्र ब” मध्ये देण्यात आला आहे. सदर खर्चामध्ये बांधकामावरील खर्च हा अस्तित्वात असलेल्या इमारतीचे नुतनीकरण करुन अभ्यासक्रम सुरु करण्याकरीता आहे. तद्नंतर स्वतंत्र इमारत व वसतिगृहाकरीता आवश्यक मान्यता भविष्यात घेण्यात येईल.

४. औद्योगिक प्रशिक्षण संस्था अहिल्यानगर जि. अहिल्यानगर संस्थेकरीता आवश्यक असणाऱ्या ३९ पदांच्या मान्यतेचा प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीसमोर सादर करण्यात येईल.

५. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून संस्थेकरीताचा खर्च मागणी क्रमांक झेडए-२, ०३, प्रशिक्षण,००३, कारागीर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण (०२) (०८)प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थाचा विस्तार करणे (२२३०ए२०९) (कार्यक्रम) या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक ०६ मे, २०२५ रोजी मौजे चौंडी ता. जामखेड जि. अहिल्यानगर येथे संपन्न झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५१६१६३६१६०६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MITHUN MOHANRAO SALUNKHE

Digitally signed by MITHUN MOHANRAO SALUNKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=eb410b645758d07ea6303743e3a96f12f7b5ea5c78305aa3546f1b05a4d188d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=928224E8C07F06F0A63241EEC16360F9961117B3DFDA771ED6746D1433B5EA7A, cn=MITHUN MOHANRAO SALUNKHE
Date: 2025.05.16 16:37:26 +05'30'

**( मिथुन साळुंखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नाशिक
४. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, नाशिक (संचालनालयामार्फत)
५. निवड नस्ती, व्यशि-३

| प्रपत्र-अ<br>अहिल्यानगर जि. अहिल्यानगर येथे मुलींसाठी नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्याकरिता प्रस्तावित व्यवसाय अभ्यासक्रमांचा तपशिल | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | व्यवसाय | तुकडयांची संख्या | प्रवेश क्षमता |
| १ | मेकॅनिक इलेक्ट्रीक व्हेईकल | २ | ४८ |
| २ | टेक्नीशियन पॉवर इलेक्ट्रानिक्स सिस्टीम | २ | ४८ |
| ३ | इंडस्ट्रीयल रोबोटीक्स ॲण्ड डिजीटल मॅन्युफॅक्चरिंग टेक्नीशियन | २ | ४० |
| ४ | सॉफ्टवेअर टेस्टींग असिस्टंट | २ | ४८ |
| ५ | हेल्थ सॅनिटरी इंन्स्पेक्टर | २ | ४८ |
| ६ | फॅशन डिझायनिंग ॲण्ड टेक्नॉलॉजी | २ | ४० |
| ७ | फुड प्रॉडक्शन ( जनरल ) | २ | ४८ |
| ८ | ट्रॅव्हल ॲण्ड टूर असिस्टंट | २ | ४८ |
| | **एकूण** | **१६** | **३६८** |

| प्रपत्र-ब | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (रु. लाखांत) |
| | आवर्ती बाब | | अनावर्ती बाब | | |
| अ.क्र. | बाब | आवश्यक तरतूद | अ.क्र. | बाब | आवश्यक तरतूद (अंदाजित) |
| १ | वेतन | २३२.०१ | १ | यंत्रसामुग्री व हत्यारे | २४८.०० |
| २ | विद्यावेतन | २२.०८ | २ | टूलकिट्स | ५०.०० |
| ३ | कच्चा माल | १२.१० | ३ | बांधकाम * | ६००.०० |
| ४ | कार्यालयीन खर्च व प्रवास खर्च, इतर खर्च | १६.०० | | | |
| | एकूण | २८२.१९ | | एकूण | ८९८.०० |
| | | | | एकूण आवर्ती व अनावर्ती खर्च रु. | ११८०.१९ |

* सदर खर्चामध्ये बांधकामावरील खर्च हा अस्तित्वात असलेल्या इमारतीचे नुतनीकरण करुन अभ्यासक्रम सुरु करण्याकरीता आहे. तद्नंतर स्वतंत्र इमारतीकरीता व वसतिगृहाकरीता आवश्यक मान्यता भविष्यात घेण्यात येईल.